**कोरोना आजाराशी संबंधित उपायोजनांचा खर्च वित्त आयोगाच्या अनुदानातून व <u>त्यावरील व्याजातून करण्याबाबत</u>**

**महाराष्ट्र शासन**

नगर विकास विभाग

शासन परिपत्रक क्र. टीएफसी-८०१५/प्र.क्र. १०६/ नवि-०४

मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.

**दिनांक :- १४ सप्टेंबर, २०२०**

<u>संदर्भ :-</u>

१. शासन निर्णय नगर विकास विभाग क्र. टीएफसी-८०१५/प्र.क्र.१०६/नवि-०४, दिनांक ०३ ऑगस्ट, २०१५
२. शासन परिपत्रक नगर विकास विभाग क्र. टीएफसी-८०१५/प्र.क्र. १०६/नवि-०४, दिनांक २८ मार्च, २०२०

**<u>शासन निर्णय :-</u>**

कोरोना आजाराशी संबंधित उपायोजना करण्यासाठी नागरी स्थनिक स्वराज्य संस्थांना निधीची आवश्यकता भासत असल्याचे निदर्शनास आले आहे. या पार्श्वभूमीवर नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांना कारोना आजाराच्या अनुषंगोन उपायोजना करण्यासाठी निधी उपलब्धतेच्या अनुषंगाने खालीलप्रमाणे उपाययोजना/ कार्यपद्धती निश्चित करून देण्याचा निर्णय शासनाने घेतला आहे.

१) नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांनी त्यांच्या परिक्षेत्रातील कोविड उपाययोजनांसाठी मदत व पुनर्वसन विभागामार्फत, जिल्हाधिकारी यांच्याद्वारे प्राप्त होणाऱ्या निधीचा प्राधान्याने विनियोग करावा.

२) वरील १ प्रमाणे उपलब्ध होणारा निधी वापरल्यानंतर कोराना आजाराशी संबंधित उपाययोजनांसाठी ज्या नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांकडे १४ व्या वित्त आयोगाच्या पूर्वीच्या वित्त आयोगाच्या निधीवरील व्याजाची रक्कम शिल्लक असल्यास त्यांनी अशा रकमेचा वापर या प्रयोजनासाठी प्राधान्याने करावा.

३) वरील १ व २ प्रमाणे उपलब्ध होणाऱ्या निधीचा विनियोग केल्यानंतर कोरोना आजाराशी संबंधित उपाययोजनांसाठी १४ व्या वित्त आयोगाच्या कालावधीत नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांना प्राप्त झालेल्या वित्त आयोगाच्या मुलभूत व कार्यात्मक अनुदानाच्या रकमेवर **<u>जमा झालेल्या व्याजाच्या रकमेचा वापर करण्यात यावा.</u>**

४) या व्याजाच्या रकमेचा विनियोग करताना कोविड-१९ प्रतिबंधात्मक उपाययोजनांमध्ये कन्टेंमेंट झोन घोषित करणे व कन्टेंमेंट झोनचे व्यवस्थापन करणे, कोविड केअर सेंटरचे व्यवस्थापन करणे (औषधोपचाराचा खर्च वगळून) कोविड उपाययोजनांच्या अनुषंगाने अशा मृतदेहांवर अंत्यसंस्कार करण्यासाठी लागणाऱ्या सर्व उपाययोजनांवर होणारा खर्च देखील सर्वसाधारणपणे समाविष्ट राहतील.

५) अशा प्रकारे वित्त आयोगाच्या अनुदानावरील व्याजाच्या रकमेतून कोविड उपाययोजनांसाठी विनियोग करण्यासाठी प्रशासकीय मान्यता देण्याचे अधिकार संबंधित आयुक्त, महानगरपालिका आयुक्त यांना राहतील. यामधून खर्च करण्यासाठी मुख्याधिकारी अ वर्ग नगरपरिषद यांना रूपये ३० लक्ष, मुख्याधिकारी ब वर्ग नगरपरिषद यांना रूपये २० लक्ष, मुख्याधिकारी क वर्ग नगरपरिषद तसेच मुख्याधिकारी, नगरपंचायत यांना रूपये १० लक्ष या मर्यांदेत प्रशासकीय मान्यता देण्याचे अधिकार प्रत्यायोजित करण्यात येत आहेत. त्याचा संबंधित मुख्याधिकारी यांनी सुयोग्य प्रकारे वापर करावा. त्यापुढील व्याजाच्या रकमेचा कोविड उपाययोजनांसाठी विनियोग करण्यासाठी नगर परिषदा व नगरपंचायतीनी जिल्हाधिकारी यांच्याकडून प्रशासकीय मान्यता घ्यावी.

६) या वित्त आयोगाच्या व्याजाच्या रकमेमधून कोविड उपाययोजनेसाठी वरीलप्रमाणे खर्च केल्यांनतर उर्वरित व्याजाच्या रकमेचा विनियोग शासन निर्णय दिनांक ०४.०८.२०१५ मध्ये विहित प्रयोजनासाठी (जसे की घनकचरा व्यवस्थापन/ केंद्र व राज्य योजनेंतर्गत मंजूर पायाभूत सुविधा प्रकल्पांवरील लोकवर्गणी, मनपा/ नपा हिस्सा व असे प्रकल्प पूर्ण करण्यासाठी लागणारा अतिरिक्त खर्च इत्यादी), विहित सक्षम प्राधिकाऱ्यांच्या मान्यतेने करण्यास देखिल अनुमती देण्यात येत आहे.

७) कोविड-१९ च्या अनुषंगाने नागरी भागात काम करणाऱ्या नगारी स्थानिक स्वराज्य संस्था स्तरावरील संबंधित कर्मचारी, नगरपरिषदेचे सफाई कर्मचारी, कोविड-१९ च्या अनुषंगाने सर्वेक्षणाचे काम करणाऱ्या अंगणवाडी सेविका, अंगणवाडी मतदनीस, आशा कार्यकर्त्या, असे सर्व कर्मचारी जोखीम पत्करुन काम करत असल्यामुळे त्यांना नियमित वेतन मानधना व्यतिरिक्त रुपये १०००/- इतकी प्रोत्साहनपर रक्कम १२ व्या, १३ व्या व १४ व्या वित्त आयोगाच्या व्याजाच्या रकमेतून देण्यात यावी.

०२. संदर्भाधीन दिनांक ३ ऑगस्ट, २०१५ च्या शासन निर्णयातील अन्य बाबी कायम राहतील.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून, त्यांचा संगणक संकेतांक २०२००९१४१८२३५६७२२५ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,**

PANDURANG JOTIBA JADHAV

Digitally signed by PANDURANG JOTIBA JADHAV
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=URBAN DEVELOPMENT DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=300d785e12fdc19db0612f1ffdf83e54efe7da2b1bc63d18df8e09b3c7eece65, cn=PANDURANG JOTIBA JADHAV
Date: 2020.09.14 18:58:07 +05'30'

**(पां. जो. जाधव)**
**सह सचिव, नगर विकास विभाग**

**प्रत :-**

१. मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव
२. मा. मंत्री (नगर विकास) यांचे खाजगी सचिव

३. मा. राज्यमंत्री (नगर विकास) यांचे खाजगी सचिव
४. मा. मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई.
५. अपर मुख्य सचिव, वित्त विभाग मंत्रालय, मुंबई.
६. आयुक्त तथा संचालक, नगरपरिषद प्रशासन संचालनालय, वरळी, मुंबई.
७. कार्यकारी संचालक, महाराष्ट्र नागरी विकास अभियान संचालनालय, मुंबई
८. अभियान संचालक, स्वच्छ महाराष्ट्र अभियान (नागरी) , मुंबई
९. महालेखापाल कार्यालय, महाराष्ट्र १/२ मुंबई/नागपूर.
१०. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
११. सर्व विभागीय आयुक्त
१२. सर्व जिल्हाधिकारी
१३. आयुक्त, सर्व संबंधित महानगरपालिका
१४. मुख्याधिकारी, सर्व नगरपरिषदा
१५. मुख्याधिकारी, सर्व नगरपंचायती
१६. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी
१७. प्रधान सचिव, नगर विकास विभाग (१) यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
१८. प्रधान सचिव, नगर विकास विभाग (२) यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
१९. निवडनस्ती, (नवि-०४)

*****